**अपर निबंधक, सहकारी संस्था,**
**गट-अ या संवर्गातील नियुक्ती**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः राजस १८१४/प्र.क्र.६९/५-स**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: ३० मे, २०१५

<u>वाचा</u> :

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक राजस-१०१४/प्र.क्र.४२/५-स, दि.१/८/२०१४.

२) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे आदेश क्रमांक अर्थ/ वलिशे/बीड जिमस /कलम ११०-A/१४, दिनांक ११/१२/२०१४.

३) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे आदेश जा.क्र.अर्थ/ मुद/मसकार्ड/अवसायक/२३८८/२०१४, दि.११/१२/२०१४.

४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र जा.क्र. आस्थापना/ कक्ष-२/अ-१/निबदली/प्रनि/११३२/२०१४, दि.११/१२/२०१४.

<u>प्रस्तावना</u> :

श्री.डी.बी.मुकणे, अपर निबंधक यांची संदर्भाधीन क्र.१ येथील दिनांक १/४/२०१४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासक मंडळ अध्यक्ष, बीड जिल्हा मध्यवर्ती सहकारी बॅक, मर्या. बीड या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली होती. तथापि संदर्भाधीन क्र. २ येथील दि.११/११/२०१४ च्या सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ११०-A(१)(III) अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुसार जिल्हाधिकारी, बीड यांची प्रशासक मंडळ अध्यक्ष म्हणून नियुक्ती केल्याने श्री.मुकणे यांचेकडील प्रशासक मंडळ अध्यक्ष, बीड जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक, मर्या. बीड चा पदभार संपुष्टात आला. संदर्भाधिन क्र.३ येथील दि.११/११/२०१४ सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या आदेशान्वये श्री.डी.बी.मुकणे यांची महाराष्ट्र राज्य सहकारी कृषि ग्रामीण विकास बहुउद्देशिय बँक, मर्या., मुंबई या संस्थेवर श्री.ए.के.चव्हाण, अपर निबंधक, सहकारी संस्था यांच्याऐवजी अवसायक म्हणून नियुक्ती करण्यात आली. श्री.मुकणे यांनी दि.१५/११/२०१३ रोजी नियुक्तीच्या पदाचा कार्यभार स्विकारला आहे. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील तरतूदीनुसार श्री.मुकणे यांच्या

अपर निबंधक, सहकारी संस्था तथा अवसायक, महाराष्ट्र राज्य सहकारी कृषि ग्रामीण विकास बहुउद्देशिय बँक, मर्या., मुंबई या पदावरील प्रतिनियुक्तीने नेमणूकीचे आदेश शासन स्तरावरुन निर्गमित करणे आवश्यक असल्याने संदर्भाधीन क्र. ४ येथील पत्रान्वये सहकार आयुक्तांनी प्रस्ताव सादर केला व सदर बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) व ४(५) मधील तरतूदीनुसार सहकार खात्यातील खाली नमूद केलेल्या अपर निबंधक, सहकारी संस्था, गट-अ या संवर्गातील अधिकाऱ्याची दिनांक ११/१२/२०१४ पासून प्रशासकीय कारणास्तव त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी प्रतिनियुक्तीने केलेल्या नेमणूकीस शासनाची कार्योत्तर मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव, पदनाम | पदस्थापनेचे ठिकाण व पद |
|---|---|---|
| १ | श्री. डी. बी. मुकणे, अपर निबंधक, सहकारी संस्था | अपर निबंधक, सहकारी संस्था तथा अवसायक, महाराष्ट्र राज्य सहकारी कृषि ग्रामीण विकास बहुउद्देशिय बँक, मर्या., मुंबई. |

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०११६५३२७१८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Muloo Dhadwe

Digitally signed by Suresh Muloo Dhadwe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suresh Muloo Dhadwe
Date: 2015.06.01 16:54:32 +05'30'

( सु. मु. धाडवे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२. मा. मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री (सहकार) / (पणन) / (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव

४. अ.मु.स. (वस्त्रोद्योग)/ (पणन)/ प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहायक

५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,

६. साखर संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,

७. मॅनेजर, महाराष्ट्र राज्य सहकारी कृषि विकास बँक मर्या., मुंबई

८. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,

९. संचालक (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर,

१०.सर्व विभागीय सहनिबंधक,सहकारी संस्था (प्रशासन /लेखापरीक्षण),

११.सर्व जिल्हा उपनिबंधक,सहकारी संस्था,

१२.सर्व जिल्हा विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था,

१३.महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता),

१४.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

१५.संबंधित अधिकारी, द्वारा सहकार आयुक्त व निबंधक,सह.संस्था,महाराष्ट्र राज्य, पुणे,

१६.सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,

१७.निवड नस्ती (कार्यासन-५स).